**कोल्हापूर जिल्ह्यातील इतर जिल्हामार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१७/प्र.क्र.०६/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- १९ जुलै, २०१७

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक मुअ (पुणे)/का-२/रेशा/१९९/५९७१/२०१६ दि.०७/०२/२०१७.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक मुअ (पुणे)/का-२/रेशा/१९९/१९८०/२०१६ दि.२६/०४/२०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे/ यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये कोल्हापूर जिल्ह्यातील इतर जिल्हामार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्ताव व सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ, गावांची संख्या व लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणुन दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ, गावांची संख्या व लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर विचारात घेता कोल्हापूर जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रस्त्याचे नाव | साखळी क्रमांक | अंतर (कि.मी.) | पूर्वीच्या रस्त्यांचा क्रमांक व साखळी क्रमांक | नव्याने दिलेला प्रजिमा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रा.मा. १८९ ते चंद्रे- निगवे - कावणे- चुये- वडकशिवाले- इस्पुर्ली- दिंडनेर्ली- दर्याचे वडगांव - कोगील बु.- कणेरी- गोकुळ शिरगांव औद्योगीक वसाहत- नेर्ली- हलसवडे- पट्टणकोडोली रा.मा. १७७ पर्यंत रस्ता | ०/०० ते ३३/३०० | ३३.३०० | इ.जि.मा. १८६ ६/७०० ते १४/२०० (७.५०० कि.मी)<br><br>इ.जि.मा.८० ०/०० ते १२/६०० (१२.६०० कि.मी)<br><br>इ.जि.मा. ७८ ०/०० ते ९/२०० (९.२०० कि.मी)<br><br>इ.जि.मा. १८८ ४/५० ते ८/५० (४.००० कि.मी) | प्रजिमा ८९ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | चांदे- घुंगुरवाडी- कांचनवाडी- सोनाळी- चौंडाळ- भाटणवाडी- हासूर- कुरूकली- बेल्हे- म्हाळुंगे- रामा.१९६- येवती पाटी- वडकशिवाले- बाचणी- सावडे- चौंडाळपाटी रामा १९५ ला मिळणारा रस्ता. | ०/०० ते २३/९० | २३.९०० | इ.जि.मा. ८३<br>०/०० ते १०/८००<br>(१०.८०० कि.मी)<br><br>प्र.जि.मा.३५<br>९/०० ते ११/००<br>(२.००० कि.मी)<br><br>ग्रा.मा. १७२<br>०/०० ते ३/००<br>(३.०० कि.मी)<br><br>इ.जि.मा. ८४<br>०/०० ते ४/५०<br>(४.५०० कि.मी)<br><br>इ.जि.मा. ८५<br>३/४० ते ७/००<br>(३.६०० कि.मी) | सदरचा रस्ता प्रजिमा-४२ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहे. त्यामुळे प्रजिमा ४२ ची एकूण लांबी ४२/२०० कि.मी. इतकी होईल. |

सदर इ.जि.मा./ग्रा.मा. रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत. सदर रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती केल्यास रस्ते विकास योजना २००१-२१ मधील कोल्हापूर जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** लांबीत **५७.२००** कि.मी. ने वाढ होवून एकूण लांबी **१६१५.९२ कि. मी.** इतकी होईल व इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्याच्या लांबीत ५४.२०० कि.मी. ने घट होऊन एकूण **२०९९.५३५ कि. मी.** इतकी होईल. तसेच ग्रामीण मार्गाच्या एकूण लांबीत ३.०० किमीने घट होऊन एकूण लांबी **३९८९.०० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०७१९१७५३५९६०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.07.19 17:54:33 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,कोल्हापूर.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, कोल्हापूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.